कृष्णा प्रकल्पाअंतर्गत कण्हेर उजव्या व डाव्या कालव्यावरील २ पुलांच्या बांधकामास विस्तार व सुधारणा अंतर्गत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/(१६७/१४)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई

तारीखः ०८ /०८/२०१४

**वाचा**

**शासन निर्णय क्रमांकः कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मकृखोविम/२१४/(१६७/२०१४)/प्रशा २/ दि. २०.२.२०१४**

**प्रस्तावना**

कण्हेर उजवा कालवा व त्यावरील बांधकामे सुमारे १९८० ते १९८५ दरम्यान झाली असून सदर कालव्यावर १९८५-८६ पासून सिंचन व्यवस्थापन चालु झालेले आहे. कण्हेर उजवा कालवा कि.मी. सा.क्र.२६/०८० येथे राजेवाडी व निगडी येथील लोकांना कालवा ओलांडण्यासाठी पादचारी पुल बांधण्यांत आला होता. सदर पुलाचे बांधकाम दगडी असून त्यावर स्लॅब टाकण्यांत आले होते. सततच्या आवर्तनामुळे पुलाचे बांधकाम ठिसूळ होवून स्लॅबचे स्टीलही उघडे पडले आहे. कालव्या नजीक गेल्या १० वर्षामध्ये नागरी वस्ती वाढलेली आहे त्यामुळे पुलावरुन सतत वाहतुक असते. सदरचे पुल अत्यंत अरुंद असल्यामुळे तसेच पुलाचे संरक्षण कठडे पडल्यामुळे पुलावरुन शेतीचे अवजारे व ट्रॅक्टर इ. जावू शकत नसल्यामुळे स्थानिक ग्रामस्थांनी नवीन रुंद पुल बांधण्याबाबत निवेदन दिले आहे. त्यानुसार संकल्पचित्र विभागाकडून सदर पुलाची संकल्पन तयार करुन ४.२५ मी. रुंदीचे संधानकामध्ये पुल बांधण्याचे काम सदर अंदाजपत्रकामध्ये घेण्यांत आलेले आहे.कण्हेर डावा कालवा कि.मी. ० ते २० मधील सिंचन व्यवस्थापन सन १९८६-८७ पासून सुरु आहे. कालव्यावरील बांधकामे व अस्तरीकरणाची कामे सन १९८१-८२ सालात पूर्ण झालेली आहेत. सदर कालव्याच्या आखणीच्या वेळी सा.क्र. १५/९०५ येथील लिंब माहुली रस्त्या पुलाचा समावेश होता तथापि,प्रत्यक्ष कामाच्या वेळी सदर पुलास मंजूरी प्राप्त न झाल्यामुळे ते पुल वगळण्यांत आले. लिंब माहुली हा रस्ता कालव्यास छेदत असल्यामुळे ग्रामस्थांना कालवाओलांडून जाण्यास अडचण होत असल्याने लोकप्रतिनिधी व ग्रामस्थांनी वारंवार या पुलाची मागणी केली आहे. सदर मागणी केलेल्या जागेच्या वरील बाजूस सा.क्र.१५/२७० येथे राज्य महामार्ग पूल व खालील बाजूस सा.क्र.१६/६०० येथे गाडी रस्ता पुल आहे.कण्हेर डाव्या कालव्याच्या आराखडयात सदर पुलाचा समावेश नसल्यामुळे वहनव्यय टाळण्सासाठी विनास्तंभ पूल प्रस्तावित करण्यांत आला आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाकडील १६.५ मी. लांबीच्या पुलाचे संकल्पन उपलब्ध नसल्यामुळे उरमोडी धरण विभागाकडील खटाव कालवा सा.क्र.७०/०१० येथील १६.५ मी. लांबीच्या विनास्तंभ पुलाच्या नमुना संकल्पनानुसार अंदाजपत्रक तयार करण्यात आलेले आहे. त्यानुसार सदर नमुना संकल्पनावर आधारीत प्रस्तावित पुलाची लांबी १६.५ मी. असून रुंदी ५ मी.आहे. कृष्णा प्रकल्पाअंतर्गत कण्हेर उजव्या व डाव्या कालव्यावरील २ पुलांच्या बांधकामास विस्तार व सुधारणा अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा विचार शासनाच्या विचारधीन होता.

## शासन निर्णय

या शासन निर्णयाव्दारे कृष्णा प्रकल्पाअंतर्गत कण्हेर उजव्या व डाव्या कालव्यावरील २ पुलांच्या बांधकामास विस्तार व सुधारणा अंतर्गत रु. ४३.९३ लक्ष (कामावरील खर्च रु ४२.९४ लक्ष व रु १.६९ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

२) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

३) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (Miscellaneous) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झालयास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

४) विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी विभागाकडून करुन घेण्यात यावे.

५) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Complition Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधोर प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा यासाठी भाग भांडवली अंशदान(१२)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळास (४७०१ जे १६७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र २५ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे .

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग-पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) ) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे..

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०८१६४२४२६८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.08 16:49:25 +05'30'

कि.ल.संखे

शासनाचे कक्ष अधिकारी

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०. स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे
१३. मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, (विप्र) जलसंपदा विभाग, पुणे
१६. आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१९.अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे

२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे- १

२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक

२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,

२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/( १६७ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक ०८.०८.२०१४ चे प्रपत्र

**परिशीष्ट**

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | कण्हेरउजव्या कालव्यावरील सा.क्रं. २६/०८० येथे गावरस्ता पूल बांधणे.(राजेवाडी ते निगडी रोड) | १२.३८ |
| २. | कण्हेर डाव्या कालव्यावरील सा.क्रं. १५/९०५ येथे गावरस्ता पूल बांधणे.(लिंब ते माहुली रोड) | २९.८६ |
| | **एकुण :-** | **४२.२४** |
| | इ.टी.पी. चार्जेस | १.६९ |
| | **एकुण एकंदर :-** | **४३.९३** |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.08 16:49:51 +05'30'

**कि.ल.संखे**

**शासनाचे कक्ष अधिकारी**